**<u>बाहय यंत्रणेद्वारे करुन घेण्यात येणाऱ्या सेवांची देयके १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्ट शिर्षातून प्रदान करणेबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा-प्रशा ४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १७ जुलै, २०२०.

**<u>वाचा</u>** :- १. शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि. २ फेब्रुवारी, २०१३.
२. शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा-प्रशा ४, दि.२९ जानेवारी, २०२०.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकान्वये बाह्य यंत्रणेद्वारे शासकीय कामे करून घेणेबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये बाहययंत्रणेस करावयाचे प्रदान “१३-कार्यालयीन खर्च” या “उद्दिष्ट शिर्षा”खाली करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. संदर्भ क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये तात्पुरत्या/कंत्राटी/हंगामी कर्मचाऱ्यांचे पारिश्रमिक/मानधन इत्यादी “१० कंत्राटी सेवा” या उद्दिष्ट शिर्षातून करण्याबाबत निदेश देण्यात आलेले आहेत.

२. तथापि बाहययंत्रणेद्वारे घेण्यात येणाऱ्या सेवा देखील कंत्राटी स्वरूपाच्या असल्याने खर्चाचे काटेकोर वर्गीकरण करण्याच्या दृष्टीने बाहययंत्रणेद्वारे घेण्यात येणाऱ्या सेवेचा खर्च देखील “१० कंत्राटी सेवा” या “उद्दिष्ट शिर्षा”तून भागविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून आता खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

३. या शासन परिपत्रकाच्या दिनांकापासुन बाहययंत्रणेद्वारे घेण्यात येणाऱ्या सर्व प्रकारच्या सेवांची देयकेसुध्दा “१० कंत्राटी सेवा” या “उद्दिष्ट शिर्षा”तून भागविण्यात यावीत. आर्थिक वर्ष २०२१-२२ च्या अर्थसंकल्पात बाहययंत्रणेद्वारे घेतलेल्या सेवांच्या प्रदानाकरिता निधीची आवश्यक तरतूद “१० कंत्राटी सेवा” या बाबी खाली अर्थसंकल्पीत करण्याची सर्व विभागांनी दक्षता घ्यावी.

४. चालू आर्थिक वर्षात विभागांनी बाहययंत्रणेव्दारे घेण्यात येणा-या सेवेकरीता निधीची तरतूद “१३-कार्यालयीन खर्च” या “उद्दिष्ट शिर्षा”खाली केली असल्यास व सदर योजना संकेतांकांतर्गत “१० कंत्राटी सेवा” हे “उद्दिष्ट शिर्ष” उपलब्ध असल्यास “१३-कार्यालयीन खर्च” मधुन “१० कंत्राटी सेवा” या “उद्दिष्ट शिर्षा”मध्ये अनुदानाचे फेरवाटप करण्यात यावे. तथापी, सदर योजना संकेतांकांतर्गत “१० कंत्राटी सेवा”

हे “उद्दिष्ट शिर्ष” उपलब्ध नसल्यास चालू आर्थिक वर्षापुरता सदर खर्च “१३-कार्यालयीन खर्च” या “उद्दिष्ट शिर्षा”तून भागविता येईल.

**५.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००७१७१४३६२३९६०५ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.07.17 14:50:31 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा. राज्यपाल यांचे सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
६. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७. संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा, कोकणभवन, नवी मुंबई
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२९. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे / नाशिक/औरंगाबाद/ अमरावती नागपूर/
३०. संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई
३१. सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/नाशिक /पुणे/औरंगाबाद/ अमरावती / नागपूर
३२. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३३. निवड नस्ती/कोषा प्रशा-४